असा. क्र. २००  रजिस्टर्ड नं. एमएच/एमआर/साऊथ-२२९/२००६-०८

# महाराष्ट्र शासन राजपत्र

## असाधारण

### प्राधिकृत प्रकाशन

बुधवार, नोव्हेंबर २६, २००८/अग्रहायण ५, शके १९३०

स्वतंत्र संकलन म्हणून फाईल करण्यासाठी या भागाला वेगळे पृष्ठ क्रमांक दिले आहेत.

## भाग चार-अ

महाराष्ट्र शासनाने केंद्रीय अधिनियमांन्वये तयार केलेले (भाग एक, एक-अ आणि एक-ल यांमध्ये प्रसिद्ध केलेले नियम व आदेश यांव्यतिरिक्त) नियम व आदेश.

### वित्त विभाग

मंत्रालय, मुंबई ४०० ०३२, दिनांक १ नोव्हेंबर २००८

### अधिसूचना

**भारताचे संविधान.**

क्रमांक सेनिवे. १००८/७७/सेवा-४.— भारताच्या संविधानाचा अनुच्छेद ३०९ च्या परंतुकान्वये प्रदान करण्यात आलेल्या अधिकारांचा वापर करून महाराष्ट्राचे राज्यपाल, महाराष्ट्र नागरी सेवा (निवृत्तिवेतन) नियम, १९८२ ला आणखी सुधारणा करणारे पुढील नियम करीत आहेत :—

१. या नियमांस, महाराष्ट्र नागरी सेवा (निवृत्तिवेतन) (सुधारणा) नियम, २००८ असे म्हणावे.

२. महाराष्ट्र नागरी सेवा (निवृत्तिवेतन) नियम, १९८२ मधील नियम, १२९ (ए) मधील नियम (१), (२), (३) व (४) वगळण्यात येत असून खालीलप्रमाणे नियम सुधारित करण्यात येत आहेत. हे नियम दिनांक २४ एप्रिल १९९५ पासून सुधारित झाले आहेत असे मानण्यात यावे :—

(१) जेथे सेवानिवृत्ती उपदानाचे/मृत्यू उपदानाचे प्रदान सेवानिवृत्तीच्या/मृत्यूच्या तारखेपासून ३ (तीन) महिन्यानंतर करण्यात आले असेल, आणि रक्कम प्रदान करण्यातील विलंब हा



[किंमत : रुपये ७.००]

प्रशासनिक चुकीमुळे झाला असे स्पष्टपणे प्रस्थापित झाले असेल, तेथे ३ (तीन) महिन्यानंतरच्या कालावधीसाठी सर्वसाधारण भविष्यनिर्वाह निधीच्या ठेवीवर लागू असलेल्या व्याजदराप्रमाणे व्याज देण्यात येईल.

(परंतु असे की, या प्रकरणात नेमून दिलेल्या कार्यपद्धतीचे पालन करण्यात शासकीय कर्मचाऱ्याने कसूर केल्यामुळे उपदान प्रदान करण्यात विलंब झालेला असल्यास व्याज देय होणार नाही

आणखी असे की, ज्या प्रकरणी तात्पुरते उपदान मंजूर करण्यात आले असेल त्या प्रकरणी व्याज देय होणार नाही.)

(२) विलंबाने प्रदान करण्यात आलेल्या सेवानिवृत्ती उपदान/मृत्यू उपदानाच्या प्रत्येक प्रकरणावर मंत्रालयातील संबंधित प्रशासकीय विभाग स्वाधिकारे विचार करील, आणि सेवानिवृत्ती उपदान/मृत्यू उपदान प्रदान करण्यातील विलंब हा प्रशासकीय कारणांमुळे झाला याबद्दल विभागाची खात्री झाली असेल, तर तो विभाग यथास्थिति, महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र, मुंबई/नागपूर यांचेकडून या संबंधातील अनुज्ञेयता अहवाल प्राप्त करून घेऊन, व्याज प्रदान करील. व्याज प्रदान करण्यासाठी वित्त विभागाकडे मान्यतेसाठी शिफारस करण्याची यापुढे आवश्यकता राहणार नाही.

(३) जेथे प्रशासनिक कारणामुळे सेवानिवृत्ती उपदान/मृत्यू उपदानावर व्याजाचे प्रदान प्राधिकृत करण्यात आले असेल, अशा सर्व प्रकरणात मंत्रालयातील प्रशासकीय विभागाने जबाबदारी निश्चित करून विलंबास जबाबदार असल्याचे आढळून आलेल्या अधिकाऱ्यांसहित शासकीय कर्मचाऱ्याविरुद्ध अथवा कर्मचाऱ्यांविरुद्ध संबंधित प्रशासकीय विभाग जबाबदारी निश्चित करून त्यांच्याविरुद्ध शिस्तभंगाची कार्यवाही करील आणि उपदानाचे विलंबास जबाबदार असल्याचे आढळून आलेल्या अधिकाऱ्यांसहित, शासकीय कर्मचाऱ्याकडून किंवा कर्मचाऱ्यांकडून देय झालेल्या व्याजाची रक्कम वसूल करील.

३. महाराष्ट्र नागरी सेवा (निवृत्तिवेतन) नियम, १९८२ मधील नियम, १२९ (बी) मधील नियम (१), (२), (३) व (४) वगळण्यात येत असून खालीलप्रमाणे नियम सुधारित करण्यात येत आहेत :—

(१) जेथे निवृत्तिवेतनाचे/कुटूंब निवृत्तिवेतनाचे प्रदान ते देय झाल्याच्या तारखेपासून ६ (सहा) महिन्यानंतर प्राधिकृत करण्यात आले असेल, आणि रक्कम प्रदान करण्यातील विलंब हा प्रशासनिक कारणांमुळे झाला असे स्पष्टपणे प्रस्थापित झाले असेल, तेथे ६ (सहा) महिन्यानंतरच्या कालावधीसाठी सर्वसाधारण भविष्य निर्वाह निधीच्या ठेवीवर लागू असलेल्या व्याजदराप्रमाणे व्याज देण्यात येईल :—

परंतु असे की, या प्रकरणात नेमून दिलेल्या कार्यपद्धतीचे पालन करण्यात शासकीय कर्मचाऱ्याने कसूर केल्यामुळे निवृत्तिवेतनाचे प्रदान करण्यात विलंब झालेला असल्यास व्याज देय होणार नाही :

आणखी असे की, ज्या कालावधीसाठी तात्पुरते निवृत्तिवेतन प्रदान करण्यात आले असेल त्या कालावधीसाठी व्याज देय होणार नाही. ज्या शासकीय कर्मचाऱ्याला तात्पुरते निवृत्तिवेतन मंजूर केले असेल त्या प्रकरणी, तात्पुरत्या निवृत्तिवेतनाचे प्रदान बंद झाल्यानंतर सहा महिन्याचा कालावधी उलटल्यापासून अंतिम निवृत्तिवेतन प्राधिकृत करेपर्यंतच्या कालावधीसाठी विहित तरतुदींनुसार व्याज देण्यात येईल.

(२) विलंबाने प्रदान करण्यात आलेल्या निवृत्तिवेतनाचे/कुटुंब निवृत्तिवेतनाच्या प्रत्येक प्रकरणावर मंत्रालयातील संबंधित प्रशासकीय विभाग स्वाधिकारे विचार करील, आणि निवृत्तिवेतन/कुटुंब निवृत्तिवेतन प्रदान करण्यातील विलंब हा प्रशासकीय कारणांमुळे झाला याबद्दल विभागाची खात्री झाली असेल, तर तो विभाग यथास्थिति, महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र, मुंबई/नागपूर यांचेकडून या संबंधातील अनुज्ञेयता अहवाल प्राप्त करून घेऊन, व्याज प्रदान करील. व्याज प्रदान करण्यासाठी वित्त विभागाकडे मान्यतेसाठी शिफारस करण्याची यापुढे आवश्यकता राहणार नाही.

(३) जेथे प्रशासनिक कारणामुळे निवृत्तिवेतनावर/कुटुंब निवृत्तिवेतनावर व्याजाचे प्रदान प्राधिकृत करण्यात आले असेल, अशा सर्व प्रकरणात मंत्रालयातील प्रशासकीय विभागाने जबाबदारी निश्चित करून विलंबास जबाबदार असल्याचे आढळून आलेल्या अधिकाऱ्यांसहित शासकीय कर्मचाऱ्याविरुद्ध अथवा कर्मचाऱ्यांविरुद्ध संबंधित प्रशासकीय विभाग जबाबदारी निश्चित करून त्यांच्याविरुद्ध शिस्तभंगाची कार्यवाही करील आणि निवृत्तीवेतन/कुटुंबनिवृत्ती वेतनाचे विलंबास जबाबदार असल्याचे आढळून आलेल्या अधिकाऱ्यांसहित, शासकीय कर्मचाऱ्याकडून किंवा कर्मचाऱ्यांकडून देय झालेल्या व्याजाची रक्कम वसूल करील.

४. सदर अधिसूचना, महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेब साईटवर उपलब्ध करण्यात आली असून तिचा संकेतांक २००८११०७१६०८४७००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

**नि. बा. वाडेकर,**
शासनाचे उप सचिव.

## FINANCE DEPARTMENT

Mantralaya, Mumbai 400 032, dated the 1st November 2008

*NOTIFICATION*

CONSTITUTION OF INDIA.

No. PEN. 1008/77/SER-4.— In the exercise of the powers conferred by the proviso to article 309 of the constitution of India, the Governor of Maharashtra is hereby pleased to make the following rules further to amend the Maharashtra Civil Services (Pension) Rules, 1982, namely :—

1. These rules may be called the Maharashtra Civil Services (Pension) (Amendment) Rules, 2008.

2. In Rule 129 A of the Maharashtra Civil Services (Pension) Rules, 1982 (hereinafter referred to as " the principal Rules ") for sub-rules (1) to (4), the following sub-rules shall be substituted and shall be deemed to have been substituted with effect from 24th April 1995, namely :—

(1) Where the payment of retirement gratuity or death gratuity, as the case may be has been delayed beyond the period of three months from the date of retirement or death, and it is clearly established that the delay in payment was attributable to administrative lapse, an interest at the rate applicable to General Provident Fund deposits shall be paid on the amount of gratuity, in respect of the period beyond three months :

Provided that, no interest shall be payable if the delay in payment of such gratutiy was attributable to the failure on the part of the Government servant to comply with the procedure laid down in this Chapter :

Provided further that no interest shall be payable in the case where a provisional gratuity is paid.

(2) Every case of delayed payment of retirement gratuity or death grauity, as the case may be, shall *suo motu*, be considered by the concerned Administrative Department, and where the Department is satisfied that the delay in payment of such gratuity was caused on account of administrative lapse, that Department shall sanction payment of interest after obtaining the admissibility report, in this behalf, from the Accountant General (Accounts and Entitlement), Maharahtra, Mumbai or Nagpur, as the case may be. The approval of the Finance Department for payment of such interest shall not be necessary.

(3) In all cases, where interest has been paid on retirement gratuity or death gratuity, as the case may be, due to administrative lapse, the concerned Administrative Department shall fix the resposibility and take disciplinary action against the Government servant or servants concerned, including the concerned officer, who are found responsible for the delay in the payment of such gratuity and recover the amount of interest required to be paid from the Government Servant or servants concerned including the concerned officer who are found responsible for the delay in the payment of such grauity.

3. In Rule 129 (B) of the principal Rules, for sub-rules (1) to (4), the following sub-rules shall be substituted and shall be deemed to have been substituted with effect from 24th April 1995, namely :—

(1) Where the payment of pension or family pension authorised after six months from the date when its payment became due, an interest at the rate applicable to General Provident Fund deposits shall be paid on the amount of pension, in respect of the period beyond six months :

Provided that, no interest shall be payable if the delay in payment of pension was attributable to the failure on the part of the Government servant to comply with the procedure laid down in this Chapter :

Provided further that no interest shall be payable for the period for which a provisional pension is paid. In case of Government Servant to whome provisional pension is sanctioned an interest as provided shall be paid after a period of six months from the cessation of provisional pension till the final pension is authorised.

(2) Every case of delayed pension or family pension, as the case may be, shall *suo motu*, be considered by the concerned Administrative Department, and where the Department is satisfied that the delay in payment of such pension was caused on account of administrative lapse, that Department shall sanction payment of interest after obtaining the admissibility report in this behalf from the Accountant General (Accounts and Entitlement), Maharashtra, Mumbai or Nagpur, as the case may be. The approval of the Finance Department for payment of such interest shall not be necessary.

(3) In all cases, where interest has been authorised on pension or family pension, as the case may be, due to administrative lapse, the concerned Administrative Department shall fix the resposibility and take disciplinary action against the Government servant or servants concerned, including the concerned officer, who are found responsible for the delay in the payment of such pension and recover the amount of interest required to be paid from the Government Servant or servants concerned including the concerned officer who are found responsible for the delay in the payment of such pension

4. This Notification is available on the web site of Government of Maharashtra i.e. "www.maharashtra.gov.in" and its computer code number is 20081107160847001.

By order and in the name of the Governor of Maharashtra,

N. B. WADEKAR,
Deputy Secretary to Government.

शासकीय मध्यवर्ती मुद्रणालय, मुंबई

प्रति,

महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-१, महाराष्ट्र, मुंबई (८० प्रती),

महालेखापाल (लेखा परीक्षा)-१, महाराष्ट्र, मुंबई (८० प्रती),

महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-२, महाराष्ट्र, नागपूर (४० प्रती),

महालेखापाल (लेखा परीक्षा)-२, महाराष्ट्र, नागपूर (४० प्रती),

अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई (४० प्रती),

निवासी लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई (५ प्रती),

मुख्य लेखापरीक्षक, स्थानिक निधी लेखा, नवी मुंबई,

संचालक, माहिती व जनसंपर्क विभाग, मंत्रालय, मुंबई (५ प्रती)

ग्रंथपाल, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय ग्रंथालय, सहावा मजला, विधानभवन, मुंबई ४०० ०३२,

राज्यपालांचे सचिव,

मुख्यमंत्र्यांचे सचिव,

सर्व मंत्री यांचे खाजगी सचिव,

सर्व राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव,

* प्रबंधक, मूळ न्याय शाखा, उच्च न्यायालय, मुंबई,

* प्रबंधक, अपील शाखा, उच्च न्यायालय, मुंबई,

* सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई,

* सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई,

सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी,

मंत्रालयातील सर्व विभाग,

मंत्रालयाच्या निरनिराळ्या विभागांच्या अधीन असलेल्या सर्व विभागांचे व कार्यालयांचे प्रमुख,

वित्त विभागातील सर्व कार्यासने (ग्रंथपाल ५ प्रती),

निवडनस्ती, कार्यासने सेवा-४.

*पत्राद्वारे